# LIFE OF GEORGE WASHINGTON,

FROM CHAMBER'S MISCELLANY.

TRANSLATED BY THE LATE

VISHṆU PARASHURÁM RÁNAḌE,

REVISED BY

VISHṆU PARASHURÁM SHÁSTRÍ PANDIT.




PRINTED AND PUBLISHED

WITH THE PERMISSION OF

THE DIRECTOR OF PUBLIC INSTRUCTION AND
THE PRESIDENT OF THE DAKSHIṆÁ
PRIZE COMMITTEE

BY

THE PROPRIETORS OF THE "INDU-PRAKASH" PRESS.

**SECOND EDITION.**

Bombay:

1874.

*(Registered under Act XXV. of 1867.)*

Price Rupees four





दक्षिणा प्रैज कमितीनें बक्षिसें दिलेल्या ग्रंथांची माला.

नंबर ४.

# जार्ज वाशिंग्तन

याचा इतिहास.

हा ग्रंथ

"चेंबरस् मिसलनी" या ग्रंथाच्या आधारानें


## विष्णु परशुराम रानडे

यांनीं केला


(पुणें, इसवी १८५२.–शके १७७४.)

तो

मे. दैरेक्तर आफ् पब्लिक इनस्त्रक्शन व मे. दक्षिणा प्रैज कमितीचे अध्यक्ष यांच्या आज्ञेवरून

विष्णु परशुराम शास्त्री पंडित

यांनीं तपासला.


आवृत्ती दुसरी.

मुंबईत

इंदुप्रकाशाच्या मालकांनीं आपल्या छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

इसवी सन १८७४.–शके १७९५.




किंमत ६ आणे.

विद्याचार व कलाकौशल्य यांच्या संपन्नतेविषयीं व स्वदेशीय राजकीय सत्तेविषयीं प्राचीन काळीं उत्तम स्थितींत असलेला आणि आज शेकडो वर्षें अधम-स्थितीस पावून राहिलेला जो हा हिंदुस्थान देश त्याच्या उद्धारार्थ सर्व प्रकारांनीं यत्न करणें हें प्रत्येक हिंदुमनुष्याचें कर्तव्य कर्मच आहे. या उद्धाराचे मार्ग बहुत आहेत. कोणत्याही देशांत स्वराज्य नष्ट झालें आणि विद्या, ज्ञान, कलाकौशल्य व सदाचरण हीं उत्तरोत्तर क्षीण होत चाललीं अथवा लयास गेलीं ह्मणजे तेथील लोकांच्या दैन्यास व दुर्दशेस पारावार नाहींसा होतो. त्यांचीं शरीरें व मनें अगदीं निःसत्व होतात. तेथील मनुष्यास आपण ह्मणजे "कःपदार्थ" असें वाटूं लागतें. कोणतीही मोठी धाडसाची अथवा दीर्घ प्रयत्नाची गोष्ट करण्यास मन उत्साह धरीत नाहीं. स्वदेशाच्या हितार्थ कोणतीही एखादी लहानमोठी गोष्ट करण्याचें कदाचित कोणीं एखाद्यानें मनांत आणल्यास परकीय राजांच्या मनांत ही गोष्ट आपल्या राज्यास अथवा सत्तेस नाशक आहे कीं काय व आपल्या देशाच्या अथवा लोकांच्या हितास बाधक आहे कीं काय, असा एकदम संशय येतो. आणि तशा संशयास यत्किंचित् जर छायारूपानें

जिकडे तिकडे "आमची आतां सद्दीच नाहीं, तेव्हां आमच्या हातून कांहीं एक व्हावयाचें नाहीं," असाच ध्वनि कानीं पडतो, आणि सर्व लोक सर्वथा निरुत्साह होत्साते अगदीं स्तब्ध होऊन बसतात. असें झालें असतां ते आपल्या संसाराविषयीं व चरितार्थाविषयीं अगदीं पराधीन होतात. अशा निकृष्ट दशेस पावलेल्या देशाच्या व त्यांतल्या लोकांच्या उद्धाराचा मुख्य उपाय ह्मटला ह्मणजे त्यांच्यामध्यें अनेक प्रकारच्या विद्यांची वृद्धि करणें हा होय. तर ती आमच्या कृपाळु इंग्लिश सरकारानें चालविला आहे याबद्दल आह्मी त्याचे अत्यंत उपकारी आहों. तशीच त्या लोकांमध्यें कलाकौशल्याचीही वृद्धि केली पाहिजे. तर तिकडेही या शाहण्या व परोपकारी सरकारचें लक्ष जाण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. तिसरी गोष्ट निरनिराळ्या देशाचे इतिहास व पराक्रमी पुरुषांचीं चरित्रें यांचाही त्या लोकांत प्रसार झाला पाहिजे, तर तोही आमचें प्रस्तुतचें सरकार करीत आहे. अशा समयास सर्व पृथ्वीवर अत्यंत विख्यात जो उत्तर-अमेरिकाखंडांतील जार्ज वाशिंग्टन नांवाचा अद्वितीय पुरुष, जोअगदीं सामान्य प्रतीच्या कुळांत जन्मून अत्यंत उच्च पदास पावला आणि ज्यानें आपल्या विलक्षणबुद्धिचातुर्यानें, अलौकिक शौर्यानें, परमावधी-



समजेल कितो उपयुक्त आहे हे लिहून कळविता पुरवत नाहीं. तर स्वदेशहितेच्छु लोकांनीं स्वतः वाचूनच त्याचा अनुभव घेतला पाहिजे.

इंग्लिश भाषेमध्यें जार्ज वाशिंग्तनाचें चरित्र शेकडो विद्वानांनीं लिहिलें आहे. कोणी अत्यंत संक्षेपानें लिहिलें आहे, कोणी मोठ्या विस्तारानें लिहिलें आहे. या महापराक्रमी पुरुषाचें अत्युत्तम चरित्र ह्मणजे कांहीं अंशीं उत्तर अमेरिकेचा इतिहासच होय. तर असें तें चरित्र आपल्या लोकांत प्रसिद्ध करावें असा हेतु कैलासवासी* रा. बा. विष्णु परशराम रानडे यांच्या मनांत वीस वर्षांपूर्वीं उद्भवून त्यांनीं त्याचा मराठींत तर्जुमा केला, व तो पुस्तकें प्रसिद्ध करणाऱ्या "दक्षिणा प्रैज कमिटी" नांवाच्या मंडळीस नजर केला. तिनें तो पसंत करून रानडे यांस योग्य बक्षीस दिलें; परंतु तो ग्रंथ उत्तम असतां आजवर छापून प्रसिद्ध झाला नाहीं. हें भाषांतर केलें त्यावेळीं रा. बा. विष्णु परशराम रानडे यांचें वय २१ वर्षांचें होतें. त्यांस देशाभिमानी पुरुषांचीं चरित्रें वाचण्याचा नाद फार होता. त्यांतही त्यांस जार्ज-वाशिंग्तनाचें चरित्र हें तर अत्यंत प्रिय होतें. पाल्दिंगकृत वाशिंग्तनाच्या चरित्राचीं तर त्या पुरुषानें जशीं कांहीं पारायणेंच केलीं. इंग्लिशभाषा त्यांस

---

* हे ता. ८ आगष्ट १८७१ रोजीं लोकांतरास गेले.

इंग्रजीभाषा उत्तम लिहितां येऊं लागली होती, इतकेंच नाहीं; तर त्यांचें मन स्वदेशाभिमानानें भरून गेलें होतें, त्यामुळें ते स्वशक्त्यनुसार स्वदेशप्रीत्यर्थ शरीरानें मनानें, वाणीनें व द्रव्यानें बहुत झटले. हा ग्रंथ लिहिल्यानंतर जीं त्यांचीं वीस वर्षें या लोकीं गेलीं तीं नेहमी थोडें बहुत तरी स्वदेशप्रीत्यर्थ झटण्यांत गेलीं. त्यांत अखेरीस अनाथ विधवांच्या मुक्ततेकरितां त्यांनीं जी एकवेळ घट्ट कंबर बांधिली ती त्यांनीं आई, बंधु, आप्त, इष्टमित्र, सोयरेधायरे वगैरेनीं ती सोडण्याविषयीं पाहिजे तितका आग्रह केला तरी नाहींच सोडिली. त्याकरितां कितीही हाल सोसावे लागले तरी सोसण्याचा त्या पुरुषाचा पूर्ण निश्चय होता. अशा दृढनिश्चयाचा आह्मांमध्यें एक जरी पुरुष निर्माण होण्यास हें लहानसें उत्तम चरित्र यत्किंचित् अंशीं साधक झालें तरी हा लेख लिहिणारास परमानंद होईल.

वि. प. शा. पं.

मुंबई, ता. १ मार्च १८७२ इ.



विख्यात व जगमान्य थोर पुरुषाच्या रा. बा. विष्णु परशराम रानडे यांणीं लिहिलेल्या चरित्राची दुसरी आवृत्ति काढण्याचा प्रसंग आला आहे, याजवरून त्या अलौकिक व अनुपम पुरुषाच्या चरित्राची प्रसिद्धि व आवड जितकी आमच्या लोकांत उत्पन्न व्हावी तितकी झालेली दिसत नाहीं; तथापि ती लवकरच होईल अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. जार्ज वाशिंग्तन या अद्वितीय पुरुषाचें चरित्र वाचण्याविषयीं इच्छा व त्याजविषयीं मनामध्यें योग्य पूज्यबुद्धि हीं उत्पन्न होऊन अधिक गोडी लागण्यास त्याचें चरित्र मोठें व विशेष तपशीलवार पाहिजे हें खरें; परंतु तसें दुसरें कोणी विद्वान व स्वदेशाभिमानी गृहस्थ लिही तोंपर्यंत याजवरच निर्वाह केला पाहिजे. आतां या पुरुषाची एवढी योग्यता कोणती ह्मणून सहजच पृच्छा होईल, तर त्यास इतकेंच उत्तर आहे कीं, आजपर्यंत जे थोर व विख्यात पुरुष ह्मणून या जगांत होऊन गेले त्यांत याजसारखा वास्तविक सर्वमान्य थोर पुरुष झालाच नाहीं असें ह्मणण्यास चिंता नाहीं. ग्रीसचे आलेक्झांदर, रोमचे जुलियस सीजर व फ्रान्सचे नेपोलियन हे महापराक्रमी व शूर पुरुष होऊन गेले व त्यांची लोक वाखाणणीही करतात; परंतु

आपण आपलें योग्य कर्तव्य यथार्थरीत्या बजाविलेंस आपणास वाटावें एवढ्या प्रीत्यर्थच झाला. इतर थोर पुरुषांनीं पुष्कळ प्रकारें आपापल्या देशाचें व देशबांधवांचें थोडेंबहुत हित केलें व त्याजबद्दल जग नेहमी त्यांचे उपकार मानील यांत संशय नाहीं; परंतु जार्ज वाशिंग्टन यानें आपल्या देशबांधवांस सर्वांहून अमूल्य असें जें स्वातंत्र्यरूप रत्न तें आपल्या पराक्रमानें, चातुर्यानें, निरपेक्षबुद्धीनें व निष्प्रांजल स्वदेशप्रीतीनें संपादन करून दिलें, एवढेंच नव्हे; पण तें निरंतर आपल्या देशांत राहून आपल्या देशबांधवांस सुख व संपत्ति यांचा अनंत कालपर्यंत उपभोग घेतां येईल अशी अत्युत्तम राज्यव्यवस्था स्थापन करून ठेविली आहे. आज सर्व पृथ्वीवर युनैटेड स्टेट्स व त्यांतील लोक यांजसारखा सुखी व सर्वमान्य असा देश व लोक नाहींत असें निर्विवाद आहे. तो देश व ते लोक सर्व देशांस व लोकांस कित्ताच आहेत आणि हें फळ बहुतेक पुष्कळ अंशीं वाशिंग्टन याच्या कर्तृत्वाचें आहे. याच्या कर्तृत्वाचें वास्तविक महत्त्व लोकांच्या ध्यानांत येण्यास ज्या वेळेस त्यानें आपला देश स्वतंत्र केला त्या वेळेस त्या देशाची कशी वाईट व बिकट स्थिति झालेली होती व लोकांची दुर्दशा झालेली होती हें समजलें पाहिजे, आणि तें

## कांग्रेस, तारीख ४ जुलई १७७६.

### अमेरिकेंतील "युनैतेद स्तेत्स" यांतील मुक्त्यारांची कांग्रेस ( सभा ) मधून जाहिरनामा प्रसिद्ध झाला तो.

मानवी उलटापालटीच्या प्रसंगीं जेव्हां एका लोकांस दुसऱ्या लोकांचा राजकीय संबंध तोडणें अवश्य होतें आणि पृथ्वींतील सत्ताधिकाऱ्यांमध्यें जग व जगाचा परमेश्वर यांच्या नियमांप्रमाणें प्राप्त झालेली स्वतंत्र व बरोबरीची पदवी धारण करणें जरूर पडतें, त्या वेळेस हा संबंध तोडण्यास कोणतीं कारणें आवश्यक होतात तीं जगांतील सर्व लोकांच्या मतांस मान देण्याकरितां प्रसिद्ध केलीं पाहिजेत.

आह्मी, हे पुढील सत्य सिद्धांत स्वत: सिद्ध आहेत असें मानितों:—सर्व मनुष्यांचें नातें जन्मत: बरोबरीचें असतें; विश्वकर्त्यानें त्यांस मनुष्यत्वापासून निराळे करतां न येणारे असे कांहीं हक्क दिले आहेत. त्यांजमध्यें जीवित्व, स्वातंत्र्य व सुखाकरितां उद्योग हे दिलेले आहेत; या हक्कांचें संरक्षण करण्याकरितां मानवी प्राण्यांत जीं सरकारें स्थापन झालीं आहेत तीं ज्यांजवर सत्ता चालवावयाची त्यांच्या संमतीनें त्यांजपासून योग्य अधिकार प्राप्त होऊन स्थापन झालीं आहेत.

जेव्हां हे उद्देश एकाद्या राज्यरीतीनें नष्ट होऊं लागतात तेव्हां ती राज्यरीति बदलणें अथवा नाहींशी करणें आणि लोकांस सुख व सुरक्षितपणा हीं ज्या राज्यरीतीनें बहुत करून प्राप्त होतील असें वाटेल त्या रीतीची व्यवस्था करून तशा प्रकारच्या मूळतत्त्वांच्या पायावर राज्यरीति स्थापणें हा लोकांचा हक्क आहे. पूर्वापर विचारानें वास्तविक पाहिलें तर जी राज्यरीति फार दिवसांपासून स्थापन झाली असेल ती साधारण व क्षुल्लक कारणांकरितां बदलूं नये असें आहे; आणि जगांतील सर्व अनुभव पाहिला तर मनुष्य चालू राज्यरीति नाहींशी करून घेऊन आपलें बरें करून घेण्यापेक्षां चालत आलेल्या राज्यरीतीचींच दुःखें जेथपर्यंत सोसवतील तेथपर्यंत सोशीत असतें; परंतु जेव्हां जुलमाची व हक्क हिरावून घेण्यासारखी पुष्कळ दिवस श्रेणीच लागून त्या निरंकुश जुलुमाखालीं प्रजेस दडपण्याचा क्रम न बदलतां हेतुपुरःसर तसाच चाललासा दिसतो, तेव्हां आपल्या पुढच्या संरक्षणाकरितां ही राज्यरीति फेकून देऊन आपणास योग्य वाटेल तशी चालू करणें हा त्यांचा हक्क व त्यांचें कर्त्तव्य आहे. याप्रमाणें या संस्थानांचा सारखा दुःख सोसण्याचा प्रकार होत आला तेणेंकरून पूर्वीची राज्यरीति बदलण्याची आवश्यकता प्राप्त झाली आहे.

ग्रेत ब्रितनच्या सांप्रतच्या राजाचा पुनः पुनः त्रास देण्याचा व अपहार करण्याचा सारखा क्रम आहे आणि हा सर्व जुलमी रीतीचें राज्य स्थापन करण्याचा त्याचा हेतु दिसतो, हें सिद्ध करून दाखवि-

महत्त्वाचे, जरूरीचे व तावडतोब पाहिजेत असे कायदे करण्याविषयीं त्यानें आपल्या मुख्याधिकारी गवर्नरांस मनाई केली व ते केलेच तर आपली संमति मिळाल्यावांचून ते चालू करूं नयेत असें त्या राजानें ठरविलें आणि अशा स्थितींत कायदे महकूब राहिल्यावर त्यांजकडे लक्ष पुरविण्यास त्यानें अगदीं हयगय केली.

तसेंच लोकांस अमूल्य व केवळ जुलमी राजांसच भयंकर असा जो कायदे करण्याच्या कामांत आपले मुक्त्यार नेमण्याचा लोकांचा हक्क तो त्यांनीं सोडल्यावांचून मोठमोठ्या प्रदेशांस हितावह असे कायदे करण्याचें त्यानें नाकारलें.

कायदे करणाऱ्या मंडळयांनीं कंटाळून आपलें म्हणणें मान्य करावें याच हेतूनें जेथें कधीं जाण्याचा प्रचार नाहीं, ज्या गैरसोयीच्या व ज्या सरकारी कागदपत्र असलेल्या ठिकाणापासून दूर अशा जागीं या मंडळ्यांच्या सभा त्यानें जमविल्या.

त्यानें लोकांच्या हक्कांवर जे हल्ले केले त्यांबद्दल ज्या मुक्त्यारांच्या सभांनीं धैर्यानें तक्रार केली त्या सभा त्यानें पुनः पुनः बरखास्त केल्या.

अशा रीतीनें या सभा बरखास्त केल्यानंतर दुसरे मुक्त्यार नेमून घेण्याचेंही त्यानें बराच काळपर्यंत

नाकारिलें. असें करण्यानें निर्मूल करतां येण्यास अशक्य असे जे लोकांचे कायदे करण्याचे हक्क ते त्यांचे त्यांजपाशीं परत आले आहेत. परंतु लोकांस मध्यंतरीं या संस्थानांवर बाहेरील लोकांच्या स्वाऱ्या येण्याच्या व संस्थानांत आपआपसांत तंटे लागण्याच्या भीतींत राहावें लागलें.

त्यानें ह्या संस्थानांतील वस्ती वाढूं नये ह्मणूनही प्रयत्न केले. या हेतूस्तव त्यानें परकी लोक येथें येऊन निरंतर राहिल्यास त्यांस येथील लोकांप्रमाणें हक्क मिळण्याच्या कायद्यांस प्रतिबंध केला, परकी लोकांस येथें येऊन राहण्यास उत्तेजन यावें अशा रीतीचे नवीन कायदेही पसार केले नाहींत, आणि येथील नव्या जमिनी मिळविण्याविषयीं ज्या अटी होत्या त्या वाढविल्या.

त्यानें न्यायाधिकारसंस्थापनेविषयींच्या कायद्यांस आपलें संमत न देण्यानें लोकांस न्याय मिळण्यास प्रतिबंध केला.

न्यायाधीशांस कामावर ठेवणें व काढणें व त्यांस वेतन ठरविणें व देणें ह्या गोष्टी त्यानें केवळ आपल्या मर्जीवर ठेविल्या.

त्यानें अनेक नवीन कामगारांच्या जागा काढल्या आणि आमच्या लोकांस गांजण्याकरितां व त्यांजवळ असेल नसेल तें गिळून टाकण्याकरितां कामदार लोकांच्या टोळ्यांच्या टोळ्या इकडे पाठविल्या.

त्यानें या देशांत स्वस्थता असतांही आमच्या कायदे करणाऱ्या मंडळीच्या संमताशिवाय कायमची फौज ठेविली.

त्यानें लष्करी खात्याचा अधिकार मुलकी खात्याच्या अधिकारापासून स्वतंत्र आणि त्याहून वरचढ असा केला.

आमच्या राज्यरीतीहून भिन्न आणि आमच्या कायद्यांस अमान्य अशा न्यायरीतीस आह्मीं कबूल व्हावें ह्मणून दुसऱ्या कावेबाज कायदे करणाऱ्यांस सामील होऊन खालीं लिहिलेल्या गोष्टींविषयीं त्यांनीं केलेल्या कायद्यांस त्यानें मान्यता दिली:—

आमच्यामध्यें त्यांचीं मोठ मोठालीं सैन्यें आपल्या शस्त्रांसुद्धां येऊन राहावीं आणि त्यांनीं ह्या संस्थानांतील लोकांचे हवे तेवढे खून केले तरी उगीच वरवर चौकशी करून शिक्षेपासून त्यांचा बचाव करावा याविषयींचे कायदे:

जगांतील सर्व देशांशीं आमचा व्यापार बंद व्हावा, आमच्या संमताशिवाय आह्मांवर कर बसवावे, पंचांच्या विद्यमानें न्याय झाल्यानें जे फायदे होतात ते पुष्कळ प्रसंगीं आमचे बुडवावे आणि उगीच आह्मांवर तुफान घालून त्यांचे चौकशीकरितां आह्मांस समुद्रपार न्यावें याविषयींचे:

शेजारच्या एका प्रांतांत तेथील सरळ रीतीनें न्याय करण्याची जी इंग्लिश रीति आहे ती बंद करून तेथें मनास मानेल तशी राज्यव्यवस्था सुरू करावी आणि तिची मर्यादा इतकी वाढवावी कीं, ती उदाहरणासारखी घेऊन ती आमच्या संस्थानांत एकदम सुरू करतां यावी याविषयींचे.

आमच्या स्वातंत्र्याच्या सनदा हिरावून घ्याव्या, आमचे अमोलिक कायदे बंद करावे आणि आम-

च्या राज्यरीतींत एकदम मुळांतच फेरफार करावा, आमचा कायदे करण्याचा हक्क एकीकडे ठेवून आमच्याकरितां पाहिजेल त्या कामांत कायदे करणारे अधिकारी आपणच आहों असें प्रसिद्ध करावें याविषयींचे.

तुमचें संरक्षण आह्मी करीत नाहीं आणि आह्मी तुह्मांशीं युद्ध करणार असें त्यानें प्रसिद्ध केल्यावरून येथील राज्यपदापासून तो अर्थात च्युत झाला.

त्यानें आमच्या समुद्रावर लूट केली. आमच्या किनाऱ्याचा विध्वंस केला, आमचीं शहरें जाळलीं, आणि आमच्या लोकांचा संहार केला.

सुधारलेल्या राज्याच्या नांवास तर कलंकच आणणाऱ्या आणि रानटी स्थितीच्या काळींही क्वचितच घडणाऱ्या अशा जुलमाच्या आणि विश्वासघाताच्या कृत्यांनीं पूर्वींच आरंभिलेल्या प्राणहरणाच्या, देश ओसाड करून टाकण्याच्या आणि जुलमाच्या कृत्यांची पूर्ति करण्याकरितां केवळ द्रव्यलोभानें लढणारें परकी लोकांचें सैन्य तो आमच्या देशांत सांप्रत पाठवीत आहे.

आमच्या देशांतील जे लोक समुद्रावर त्याच्या हातीं सांपडले त्यांच्या हातीं शस्त्रें देऊन त्यांस त्यांच्याच देशावर पाठवून त्यांनीं आपल्या मित्रांचे व बांधवांचे प्राण घ्यावे अथवा आपल्या हातीं आपला नाश करून घ्यावा असें त्यांजकडून तो करवीत आहे.

त्यानें, आह्मांमध्यें घरगुती कलह उत्पन्न केले आहेत, आणि आमच्या सरहद्दीवरच्या राहिवासी लोकांवर नि-

र्दय, रानटी आणि युद्धांत, वृद्ध, तरुण किंवा अज्ञान, स्त्री, पुरुष अथवा बालक हा भेद न पाहतां मनुष्य कशाही स्थितींत असला तरी त्याचा नाश करण्याविषयीं प्रसिद्ध, असे जे इंदियन लोक त्यांस आ-णण्याचा प्रयत्न चालविला आहे.

आह्मीं या जुलमांपासून मुक्त व्हावें ह्मणून वारंवार परम नम्रतेनें त्याच्या विनवण्या केल्या; परंतु आह्मी वरचेवर केलेल्या विनवण्यांकडे लक्ष्य देऊन त्यांप्रमाणें करण्याबद्दल त्यानें वरचेवर आह्मांस त्रास मात्र दिला. जुलमी राजाचीं जीं लक्षणें त्या सर्वांनीं युक्त असा जो राजा तो स्वतंत्र लोकांवर राज्य करण्यास अगदीं अयोग्य होय.

आमचे जे ब्रितन येथील देशबंधु त्यांसही आह्मीं याबद्दल बोलण्यास राहिलों असें नाहीं. त्यांची कायदे करणारी मंडळी आह्मांवर जो अगदीं अन्यायाचा अधिकार चालविण्याविषयीं प्रयत्न करीत होती त्याजबद्दल आह्मीं त्यांस वरचेवर सुचवीत गेलों; आह्मांस आपला देश सोडून इकडे येऊन वसाहती करण्याचें काय कारण झालें याबद्दलही आह्मीं त्यांस आठवण दिली. त्यांचा मूळचा न्यायाचा अंकुर आणि थोरपणा म-नांत आणून त्यांजकडे दाद मागितली; आणि त्यांचें व आमचें जें भाऊपणाचें नातें तेंही त्यांस सुचवून जेणें-करून त्यांच्या व आमच्या मधील संबंध व पत्रव्यव-हार अगदीं बंद होईल अशीं जीं हीं बलात्काराचीं कृत्यें त्यांचा त्यांनीं तिरस्कार करावा ह्मणून त्यांची आ-ह्मीं सन्मानपूर्वक विनवणी केली. परंतु तेही न्यायाबद्दल

आणि भाऊपणाच्या नात्याबद्दल आमचें बोलणें ऐकण्यास अगदीं बहिरे झाले; याकरितां निरुपायामुळें आह्मांस जें करणें अवश्य आहे त्यास सादर झालेंच पाहिजे.—त्यांचा आमचा संबंध तोडून टाकिला पाहिजे. आणि ज्याप्रमाणें इतर मनुष्यमात्राशीं समरंगणांत शत्रु आणि शांततेच्या काळीं मित्र या नात्यानें आह्मी वागतों त्याप्रमाणेंच यांच्याशीं आह्मांस वागलें पाहिजे.

याजकरितां आह्मी अमेरिकेंतील एकत्र झालेल्या संस्थानांचे या मुख्य सभेंत जमलेले मुक्त्यार जगाचा मुख्य न्यायाधीश जो परमेश्वर त्यास आमच्या हेतूंच्या निर्दोषपणाविषयीं साक्षी ठेवून या वसाहतींतील लोकांच्या तर्फे व त्यांनीं दिलेल्या अधिकारावरून प्रतिज्ञापूर्वक असें सांगतों व जाहीर करितों कीं, हीं एकत्र असलेलीं संस्थानें अप्रतिबंध आणि स्वतंत्र आहेत आणि असें असणें हा त्यांचा हक्क आहे; तीं ब्रिटिशराजाच्या प्रजाधर्मापासून मुक्त झालीं आहेत; त्यांच्या आणि ग्रेतब्रितन राज्याच्या मधील राज्यसंबंध अगदीं तुटला आहे आणि तो तुटणें अगदीं जरूर आहे; आणि अप्रतिबंध व स्वतंत्र राज्यांप्रमाणें लढाई सुरू करण्यास, तह करण्यास, कोणा राष्ट्राशीं ऐक्य करण्यास, व्यापार सुरू करण्यास, तसेंच स्वतंत्र संस्थानांस ज्या ज्या इतर गोष्टी व कृत्यें करण्याचा अधिकार आहे तीं सर्व करण्यास त्यांस पूर्ण अधिकार आहे. आणि या जाहिरनाम्याच्या रक्षणार्थ ईश्वरी संरक्षणावर पूर्ण विश्वास ठेवून

आह्मी सर्वजण आपले प्राण, धन आणि निष्कलंक मान यांची परस्परांस भाक देत आहों.

---

आतां अशा अडचणींतून वाशिंग्टन यानें आपला देश पार केला आणि त्याची फौज त्यास राजा करण्यास तयार होती; परंतु त्या राज्यपदास त्यानें लाथ मारून त्याजपाशीं गोष्ट काढणाऱ्या लोकांची त्यानें अत्यंत निर्भर्त्सना करून त्यांची योग्य समजूत घालून दिली, आणि पुनः राजसत्ताक राज्य स्थापनेविषयीं लोक गोष्ट काढणार नाहींत असें केलें. त्या पुरुषास इतरांप्रमाणें अधिकाराचा लोभ नसल्यामुळें लढाईंत जय झाल्यावर वाशिंग्टनानें लागलाच आपल्या सेनापतीच्या जाग्याचा राजीनामा दिला. पुनः तो आपला कृषिकर्माचा धंदा चालवून आनंदांत काल घालविण्यास गेला. असा राज्यपदास लाथ मारणारा मनुष्य झाला नाहीं. अशा बाणीच्या प्रसंगीं जुलियस सीजर व नेपोलियन बोनापार्त हे नामांकित पुरुष कीर्तीच्या अत्युच्च पदापासून घसरले आणि त्यामुळेंच मरण व कारागृहवास यांप्रत अनुक्रमें पावले. परंतु वाशिंग्टनाचें या जगांतील कर्त्तव्य शिपाईगिरीच्या कामानेंच संपलें नाहीं. देशांत अव्यवस्था व लोकांच्या मनाची अस्थिरता यांनीं व्याप्ति झाली होती याजमुळें वाशिंग्टनानें महासंकटानें व अतिप्रयासानें मिळविलेलें जें स्वातंत्र्य त्याजपासून सुखसंपत्तीची प्राप्ति न होतां तेंच डळमळूं लागलें. अशा बिकट प्रसंगीं पुनः लोकांनीं वाशिं-

गतनाची प्रार्थना करून त्यास ही स्वातंत्र्याची नौका नेहमीं सुरळीत चाले अशी करून देण्याकरितां आमचे एकवार आपण नावाडी व्हा असें ह्मणून त्यास आपला नावाडी केलें. त्यास शिपाईपणाच्या पेशांतून आतां दरबारी राज्यकारभार चालविण्याच्या मोठ्या विकट कामांत लोकांनीं घातलें. परंतु यद्यपि त्यास मोठीं कामें व अधिकार यांची आवड अथवा हौस, कृषिकर्म व साधारण एकांत वासांत राहणें याप्रमाणें नसे, तथापि स्वदेशहितसंपादनार्थ आपलें तन मन धनादि सर्वस्व अर्पण करण्याचा जो त्याचा नेहमीचा बाणा त्यास अनुसरून पुनः उल्हासानें युनैतेद स्तेत्सच्या अध्यक्षाचें ह्मणजे केवळ सार्वभौम राजाचें काम करण्यास तो पुढें सरसावला. लोकांच्या इच्छेप्रमाणें आठ वर्षे राज्याधिकाराचा नावाडीपणा चालवून ती नौका उत्तम रीतीनें चालेल अशी राज्यव्यवस्था, नियम, कायदेकानू, परदेशांशीं तहनामे व स्नेहसंबंध आदिकरून नीट रीतीनें जुळवून देऊन मग त्यानें अधिकार सोडला. त्याच्या जीवमानपर्यंत तो आपला राज्याधिकारी असावा अशी लोकांची इच्छा होती, तथापि ती मोडून त्यांस प्रेमबंधनानें अधिक बद्ध करून स्वस्थतेंतील एकांतवासासारखा आपला कृषिकर्माचा उद्योग आनंदानें करण्यास आपल्या घरीं तो परत आला. याजवरून त्याचा थोरपणा केवढा व त्याची योग्यता काय हें उघड होतें. आतां येथें आणखी एक त्यास भूषण आणणारी व अलौकिक गोष्ट सांगितली पाहिजे. त्यानें मोठ्या संकटाचें, श्रमांचें, व जोखमीचें सेनाप-

तीचें काम आठ वर्षे व अतिशय नाजूक, विचाराचें व चातुर्याचें राज्याच्या अध्यक्षपणाचें काम आठ वर्षे असें एकंदर सोळा वर्षे करून आपल्या प्रियदेशाची व लोकांची चाकरी केली; परंतु त्याजबद्दल एक पैसा देखील पगाराबद्दल प्रपंचाच्या निर्वाहाकारितां ह्मणून घेतला नाहीं. त्या त्या हुद्याच्या संबंधाचा त्याचा खर्च मात्र त्यानें लोकांस अगर त्या सरकारास चालवूं दिला. आतां याजवरून त्याची निष्प्रांजल स्वदेश-प्रीति, निरपेक्षबुद्धि, अलौकिक स्वदेशभक्ति आणि वास्तविक थोरवी हीं दिसून येतात याजमुळें आजपर्यंत वाशिंग्तनाचें साम्य करण्यास दुसरा पुरुष झाला नाहीं. तो एक अद्वितीय व अनुपम होता असें ह्मणतात.

आतां अर्थातच वाशिंग्तन हा कशानें एवढा चमत्कारिक पुरुष झाला हा प्रश्न येतो व तो काय अवतारी पुरुष समजून त्याचें अनुकरण करण्याचा प्रयत्नच व्यर्थ असें समजावें अथवा तो केवळ मनुष्यच समजून त्याचें उदाहरण घेण्याचा प्रयत्न करावा असा विचार येतो. तर तो अवतारी पुरुष आहे असें कोणी समजत व मानीतही नाहीं. तो केवळ इतर मनुष्यांप्रमाणें साधारण बुद्धीचा व गुणांचा मनुष्य होता. त्याजमध्यें जे गुण होते त्या सर्वांची अत्युत्तम शिक्षणानें विशेष सुधारणा झाली व अशीं महत्कृत्यें करण्यास त्यास योग्यता आली. कोणतींही मोठीं कृत्यें करण्यास अंगीं वास्तविक पात्रता येण्यास शरीर, मन व नीति यांची उत्तम सुधारणा झाली

पाहिजे. शरीरसामर्थ्यावांचून कोणतेंही श्रमाचें, आयासाचें व विचाराचें कृत्य होत नाहीं. तसेंच विद्या व ज्ञान यांजवांचून कांहीं साधारण देखील काम नीट होत नाहीं, मग सेनापतीचीं व राज्याध्यक्षाचीं कामें करण्याचें नांवच नको. त्याप्रमाणेंच मोठीं कृत्येंही एकट्याच्यानें, एकाच्या विचारानें व मदतीनें होत नाहींत. त्यांस लोकसाह्य लागतें आणि तें साह्य भरंवसा ठेवण्यासारखा नीतिमान मनुष्य असल्याखेरीज कधींही मिळत नाहीं. यास्तव शरीर, मन व नीति यांची उत्तम सुधारणा झाल्यावांचून मनुष्यामध्यें महत्वाचीं व पुढारीपणाचीं कामें करण्यास पात्रता येत नाहीं यास सर्वांचा नेहमीचा अनुभव हेंच प्रमाण आहे. तेव्हां वाशिंग्तनाच्या आरंभापासून उत्तम प्रकारच्या शिक्षणानें शरीर, मन व नीति यांचीसुधारणा झाली होती याजमुळें तो या मोठ्या कामास योग्य होऊन एवढ्या भूषणास व उच्चपदास पात्र झाला. व्यवस्थितपणा, नियमितपणा, सहनशीलता, निस्पृहता आदिकरून गुण त्याजमध्यें फार वर्णनीय होते. आतां त्याजमध्यें गुण असूनही ईश्वरेच्छेनें चमत्कारिक प्रसंग आले नसते तर तो इतका उदयास आला नसता हें खरें आहे. तथापि आपल्या देशामध्यें असंख्य सुधारणुकेचीं व देशहिताचीं कामें करणें व होणें आहेत, तीं अशीं उत्तम प्रकारचीं मनुष्यें या भरत वर्षांत निपजल्यावांचून व्हावयाचीं नाहींत. यास्तव त्याच्या चरित्राचा आमच्या लोकांत व विशेषतः विद्यार्थ्यांत प्रसार होऊन त्याचें उदाहरण पाहून सद्गुणाचें

अनुकरण करण्यास कांहीं लोक तरी प्रयत्न करूं लागल्यास ही प्रस्तावना लिहिणारास मोठा आल्हाद होईल.

वि. प. शा. पं.

मुंबई, जानेवारी १८७४ इ.

# जार्ज वाशिंग्तन.

(हा विख्यात पुरुष अमेरिकेंत होऊन गेला)

याची खबर.

वार्जिनिया ह्मणून "युनैतेद स्तेत्स" या देशांत एक प्रांत आहे. त्यांत इसवी १७३२ त फेब्रुवारी महिन्याच्या २२ व्या तारखेस जार्ज वाशिंग्तन हा जन्मला. हा अगस्तिन वाशिंग्तन याच्या दुसऱ्या बायकोचा वडील मुलगा होता. अगस्तिन वाशिंग्तनाची मालमत्ता मोठी होती. इग्लंद देशांत आलिवर क्रामुवेल राज्य करीत असतां जान वाशिंग्तन ह्मणून एक इंग्रज स्वदेश सोडून अमेरिकेंत जाऊन राहिला होता, त्याचे हे वंशज होते. वाशिंग्तनाच्या आईचें नांव मेरि बेल असें होतें. हिचा नवरा ह्मणजे जार्ज वाशिंग्तन याचा बाप, हा इसवी सन १७४३ त अकस्मात् मृत्यु पावला, यामुळें आपल्या पांच मुलांस व आपल्या सवतीच्या दोन मुलांस विद्या वगैरे शिकविणें हें मेरि बेल हिजवरच पडलें. बाप मृत्यु पावला त्या वेळेस जार्ज वाशिंग्तन हा सारा दहा अकरा वर्षांचा होता.

अगस्तिन वाशिंग्तन हा जरी तारुण्यावस्थेंतच मरण पावला, तरी त्यानें आपल्यामागें आपल्या मुलांची

कोणत्याही प्रकारें दधात ठेविली नव्हती. लारेन्स ह्मणून जो त्याचा वडील मुलगा होता, त्यास त्यानें ५०० एकर जमीन व वर्जिनिया प्रांतांत मेरि लांद येथें लोखंडाचे कारखाने होते, त्यांत त्याचा भाग होता तो हीं दिलीं. दुसऱ्या मुलास त्यानें आपली वेस्तमोरलांद येथील मालमत्ता दिली. हा स्ताफर्द प्रांतांत मृत्यु पावला. तेथील घर, जमिनी वगैरे जी याची मालमत्ता होती ती यानें जार्ज यास दिली व तीन लहान मुलगे होते त्यांपैकीं प्रत्येकास सातशें एकर जमीन दिली. याखेरीज यानें आपल्या मुलींचीही तजवीज केली. अगस्तिन वाशिंग्तन यानें आपल्या मृत्युपत्रांत असें लिहून ठेविलें होतें कीं, माझीं जीं पांच मुलें लहान आहेत तीं वयांत येत तोंपर्यंत त्यांच्या मालमत्तेची वहिवाट माझ्या बायकोनें करावी. मेरि बेल ही फार शहाणी होती. तिच्या नवऱ्यानें तिजकडे जें काम सोंपविलें होतें तें तिनें यथास्थित केलें. ती बहुत दिवस वांचली आणि तिचा वडील मुलगा जार्ज वाशिंग्तन याचा जो पुढें उत्कर्ष झाला तो तिनें पाहिला.

मुलांच्या विद्याभ्यासाची सोय या कालीं अमेरिका खंडांत बरोबर नव्हती. श्रीमंत लोकांच्या मनांत आपल्या मुलांस चांगली विद्या शिकविण्याचें आलें तर त्यांस तीं मुलें इंग्लंद देशांत पाठवावीं लागत असत; परंतु बहुत करून सर्व लोक जवळपास ज्या शाळा होत्या त्यांतच आपलीं मुलें पाठवून तेथें जी काय विद्या होई तींतच संतोष मानून राहत असत. कधीं कधीं एखादा विद्वान् मनुष्य शाळा घाली; परंतु बहुतकरून

सर्व पंतोजींत कोणी लिहिणें, वाचणें व जमाखर्च यां-खेरीज दुसरें कांहीं मी शिकवीन असें ह्मणणारा नसे. जार्ज वाशिंग्तन यानें जी काय विद्या संपादली ती याचप्रकारच्या पंतोजींच्या हाताखालीं संपादली, आणि सोळावर्षांचा होण्यापूर्वींच त्यानें शाळाही सोडि-ली असें दिसतें. याच्या लहानपणाविषयीं जी काय माहिती आहे तिजवरून असें दिसतें कीं, हा चांग-ल्या गोष्टी सांगितल्या असतां त्या घेणारा व सरळ स्वभावाचा असा होता. लहानपणापासूनच याच्या वजनदारीविषयीं व याच्या सोबत्यांत याचा चहा असल्याविषयीं असें ह्मटलें आहे कीं, याच्या शाळें-तील सोबती आपले कज्जे निवडावयास याजकडे नेहमी आणीत असत. पोरपणाच्या खेळांपैकीं उड्या मारणें, कुस्ती करणें, पोहणें इत्यादि खेळ यास फारच आवडत असत. आपल्या शाळेंतील सोबत्यांच्या टोळ्या करून त्यांजकडून शिपाई लोकां-प्रमाणें कवाईत करवावी, त्यांस किल्ल्यावर हल्ला कसा करावा हें शिकवावें, व त्यांच्या कडून लटुपुटीच्या लढाया करवाव्या ह्या गोष्टींमध्यें त्यास फार आनंद वाटे, येणेंकरून त्याची युद्धाची आवड लहानपणींच प्रगट झाली. वाशिंग्तनाचे लहानपणचे खरडे व लेख अद्यापि जतन केलेले आहेत त्यांवरून याच्या लहानपणच्या स्वभावाचें व उद्योगाचें आप-णास चांगलें ज्ञान होतें. ते सर्व नीट जपून शिस्तवारीनें लिहिलेले आहेत. बहुतकरून त्य सर्व लेखांत अंकगणित, कर्तव्यभूमिति आणि जमीन-

मोजणी यांचीं उदाहरणें सोडवलेलीं आहेत, आणि त्यानें भूमितींतील उदाहरणांची सिद्धता करण्याकरितां ज्या आकृति काढिल्या आहेत, त्या फार सुंदर व बरोबर आहेत. याच्या लहानपणाच्या लेखांपैकीं एक लेख चतुष्पत्री वहीवर आहे, त्यास त्यानें लेखनपद्धति असें नांव दिलें आहे. त्यांत हुंड्या, पावत्या, गहाणखतें, खरेदीखतें, जमीनपत्रकें, मक्तेपत्रकें, सनदा, मृत्युपत्रें इ० हीं कशीं लिहावीं त्यांचे माने व ध्यानांत धरण्याजोगे शब्द, कारकुनाप्रमाणें लहान मोठ्या अक्षरांनीं लिहून ठेविले आहेत. ही लेखनपद्धति संपल्यावर पुढें इतर पद्यात्मक ग्रंथांतील निवडक निवडक पद्यें लिहून ठेविलीं आहेत. वाशिंग्टनाचें चरित्र लिहिणारे असें सांगतात कीं, या पद्यांची रचना फार चांगली होती असें नाहीं; पण त्यांतील विचार फारच प्रौढ होते. या पद्यांपुढें सभ्यपणाचे व लोकांशीं बोलण्या चालण्याचे नियम लिहिलेले आहेत. या प्रकारचे सुमारें ११० नियम आहेत. हे नियम त्यानें एकाच पुस्तकांतून काढून घेतले असावे किंवा अनेक पुस्तकांतून मिळवलेले असावे. हे नियम कसे काय होते, हें आमच्या वाचणाऱ्यांस कळण्याकरितां, त्यांपैकीं कांहीं आह्मी येथें लिहितोः—

या नियमांतील दुसरा नियम असा आहे कीं, "दुसऱ्या मनुष्यापुढें आपणच आपणाशीं गुंगत जाऊं नये, हातानें किंवा पायानें वाजवीत जाऊं नये." बाराव्या नियमांत असें सांगितलें आहे कीं, "उद्योगी मनुष्याशीं थोडें बोलून आपला अभिप्राय त्यास समजून द्यावा".

नयेत; व मोठ्या गहन विषयावर व ज्या गोष्टी त्यांस अविश्वसनीय वाटतील तशा गोष्टींवर संभाषण करूं नये". चाळिसाव्या नियमांत असें लिहिलें आहे कीं, विचार केल्यावांचून बोलूं नये, स्पष्ट बोलावें, फार त्वरेनें शब्दोच्चार करूं नये, जपून शब्दांचा स्पष्ट उच्चार करीत जावा. परमेश्वरानें तुमच्या मनांत जो सदसद्विचाररूप दीप लावून ठेविला आहे त्यास सर्वकाल प्रज्वलित राखण्याविषयीं झटत जा."

त्याच्या लहानपणींच्या लेखामध्यें जी बेतबात व जी व्यवस्था नजरेस येतात तीच बेतबात व तीच व्यवस्था हीं त्याच्या सर्व कामांत आमरणांत दिसून येतात. वाशिंग्टनास लहानपणीं व्याकरण शिकविलें नव्हतें, यामुळें त्यानें लहानपणीं जीं पत्रें लिहिलीं आहेत त्यांत व्याकरणाचे व भाषणपद्धतीचे कांहीं दोष आढळतात. पुढें हा जी बिनचूक व प्रांजल भाषा लिहूं लागला, तिचें संपादन त्यानें लिहिण्याचा व बोलण्याचा अभ्यास करून केलें. मोठा झाल्यावर वाशिंग्तन फ्रेंचभाषा शिकूं लागला; पण त्या भाषेंत तो फारसा निपुण झाला नाहीं. त्यास ती भाषा सरासरी लिहितां व बोलतां येत होती. वाशिंग्तन १४ वर्षांचा झाला तेव्हांच कोणीं कांहीं हुद्याचें काम त्यास सांगितलें होतें व त्यानेंही त्यास रुकार दिला







होता; पण त्यानें तें पत्करलें असतें तर त्याच्या हातून जीं महत्कृत्यें घडावीं ह्मणून ईश्वरी संकेत होता तीं घडलीं नसतीं. तें काम असें कीं, त्याचीं अचाट कृत्यें करण्याची व धांवाधांवीची आवड पाहून त्याचा सावत्र भाऊ लारेन्स ह्मणून होता त्यानें आपली भीड खर्चून त्यास इंग्रज सरकारचे आरमारांत "मिद शिपमान" ह्मणून एक अधिकार आहे तो देण्याची तजवीज करविली. त्या अधिकाराची सनद येऊन पोहोंचल्यानंतर वाशिंग्टनास या कामांत आपली योग्यता मोठी वाढेल असें वाटून मोठा आनंद झाला. कारण ज्या स्थितींत वाशिंग्टन होता त्या स्थितींतील मनुष्यास ही जागा मिळणें ह्मटलें ह्मणजे मोठी भाग्याचीच गोष्ट होती; परंतु त्याच्या आईनें या कामास फार मोडा घातल्यामुळें त्यानें तो बेत सोडला आणि तो पहिल्याप्रमाणें शाळेंत अभ्यास करीत राहिला, त्यामुळें ती जागा दुसऱ्या एका मुलास मिळाली.

वाशिंग्टन सोळा वर्षांच्या वयाचा झाला तेव्हां त्यानें शाळा सोडली. त्यानंतर त्याचा भाऊ लारेन्स याची मौंत वर्नन ह्मणून शेतवाडी होती तेथें तो कांहीं दिवसपर्यंत जाऊन राहिला. या वाडीस हें नांव, लारेन्स याचा कोणी जनरल वर्नन ह्मणून मित्र होता त्याच्या नांवावरून पडलें होतें.

लारेन्स यानें मिस फेअर फाक्स हिशीं लग्न केलें होतें. ही लारेन्स याचा जवळचा संबंधी विलियम फेअर फाक्स ह्मणून कोणी होता त्याची मुलगी होती. विलियम फेअर फाक्स हा मोठा संपत्तिमान होता

होता. वाशिंग्टन हा मौंट वर्नन येथें आपल्या भा-
वापाशीं राहत होता, त्या वेळेस लार्ड फेअर फाक्स हा
लारेन्स याचा सासरा जो विलियम फेअर फाक्स त्या-
ला भेटावयास आला होता आणि याच्या घरीं नेहमीं-
च त्याचें येणें जाणें फार होतें. तेथें त्याच्या न-
जरेस असें आलें कीं, वाशिंग्टनास जमिनमो-
जणीचें काम फार आवडतें. तो आपल्या भा-
वाचीं शेतें मोजून आपलें मोजणीचें काम तर-
तरीत वागतें ठेवतो. हें जेव्हां लार्ड फेअर फाक्स यानें
स्वतः पाहिलें, तेव्हां त्यानें आपलीं शेतें मोजण्याचें का-
म वाशिंग्टनासच सांगितलें. लार्ड फेअर फाक्स याचीं
शेतें पोतीमाक व रापाहानक या दोन नद्यांच्या मध्यें
होतीं. ही मोजणी करण्याचीं कारणें अनेक होतीं.
त्यांत मुख्य हें कीं, कोणास विचारल्या पुसल्या शि-
वाय नवीन लोक येऊन लार्ड फेअर फाक्स याच्या
शेतांतील दूरदूरच्या सुपीक जमिनींत वसाहती करूं
लागले होते, हें बंद करण्याकरितां जमिनीची
मोजणी करून बांध वगैरे घालणें अवश्य होतें.
हें मोठें जबाबदारीचें काम लार्ड फेअर फाक्स यानें
वाशिंग्टनावर सोंपविल्यानंतर तो सन १७४८ च्या
मार्च महिन्यांत आलिघनी डोंगराच्या खिंडींतील
जमिनीची मोजणी व पाहणी करण्याकरितां नि-
घाला. त्या वेळेस त्याच्या बरोबर विलियम फेअर

फाक्स याचा मुलगा जार्ज फेअर फाक्स हा होता. वाशिंग्टनास ही पाहणी करण्यास सुमारें दोन महिने फिरावें लागलें. त्यानें त्या वेळची जी आपली दिनचर्या लिहून ठेविली आहे तिजवरून असें दिसतें कीं, वाशिंग्टनास या कामांत बरेच श्रम पडले असावे. याच्या दिनचर्येच्या पुस्तकांत मार्च महिन्याच्या १५ वे तारिखेचें काम येणेंप्रमाणें लिहिलें आहे:—

"संध्याकाळपर्यंत बहुत श्रम करून घरीं गेलों आणि फराळ झाल्यानंतर निजावयास गेलों. माझ्या बरोबर जे दुसरे लोक होते त्यांस त्या रानांत कसें राहावें हें ठाऊक होतें; पण मला ठाऊक नव्हतें, त्यामुळें मी आपले सर्व कपडे अंगावरून बेतानें काढून निजावयास गेलों, तों तेथें बिछाना वगैरे कांहीं नव्हतें. तेथें एक हातरी पसरलेली होती व तिजवर एक भरभरीत घोंगडी पलंगपोसाऐवजीं घातलेली होती. तीही उवापिसांनीं भरलेली होती, हें पाहून मला मोठें आश्चर्य वाटलें. मग मी तेथून उठून गेलों आणि आपल्या सोबत्यांप्रमाणें अंगावर कपडे घालून मोठ्या आनंदानें निजलों."

सुमारें तीन वर्षांपर्यंत वाशिंग्टनानें मोजणीचें काम वर्नन प्रांताच्या आसपास केलें. कधीं कधीं तो आलिघनी डोंगरापर्यंतही त्या कामाच्या संबंधानें जाई. वाशिंग्टनास मोजणीची सनद मिळाली होती, त्यामुळें त्याची मोजणी सर्व कबूल करीत. त्या वेळीं वर्नन येथें मोजणीदार फार नव्हते ह्मणून त्याकडे पुष्कळ काम

येऊन त्यास पैसा बहुत मिळे. अमेरिकेचे पश्चिम भागीं मोजणी करतांना त्यास पावसापाण्यांत फिरावें लागे व त्यास श्रमही बहुत पडत. याविषयीं त्यानें आपल्या एका मित्रास पत्र लिहिलें आहे त्यांत तो असें लिहितो कीं, "पैसा मिळतो ह्मणूनच मी हे इतके श्रम करतों. मोजणीस जाण्याजोगी ज्या दिवशीं हवा असेल त्या दिवशीं मला दोन "पिस्तॅल"* मिळतात व कधीं कधीं सहाही मिळतात." त्याच वेळेस त्यानें आपल्या दुसऱ्या एका मित्रास पत्र लिहिलें आहे. त्यांत तो असें लिहितो कीं, "हे माझे परमप्रिय मित्रा, मी लार्ड फेअर फाक्स यांच्या घरीं आहें. आज जर माझें अंतःकरण शांत असतें, तर माझा काल येथें आनंदानें गेला असता. येथें कर्नल जार्ज फेअर फाक्स याची मेहुणी आहे, ती बोलून चालून फार चांगली आहे. हिची माझी वारंवार गांठ पडते, यामुळें माझ्या मनांत कामोद्भव होतो व तेणेंकरून 'लोलंदांतील सुंदर स्त्रियांचें मला स्मरण होऊन माझ्या मनास फार दुःख होतें.'" अशा गुह्यगुह्य गोष्टी वाशिंग्टनानें या पत्रांत लिहिल्या होत्या, यावरून ज्यास त्यानें हें पत्र लिहिलें होतें तो याचा मोठा जिवलग मित्र होता असें दिसतें. कामोद्भवाच्या योगानें यास जें दुःख होत होतें त्याविषयीं त्यानें त्या समयी बहुत पत्रें लिहिलीं आहेत, पण वाशिंग्टनाचें मन पहिल्यानें जिच्यावर बसलें होतें व जिच्या स्मरणानें यास दुःख होत होतें

* पिस्तल ह्मणून एक नाणें होतें त्याची किंमत साडेआठ रुपये होती.

अशी जी ओलंदांतील सुंदर स्त्री तिचें नांव या पत्रांत कोठें आढळत नाहीं.

इ० सन् १७५१ वर्षाच्या सुमारास वर्जिनिया प्रांतांत इंग्रजलोकांच्या ज्या वसाहती होत्या त्यांस फ्रेंच व इंदियन लोक फार त्रास देऊं लागले. फ्रेंच लोकांनीं आपल्या राज्याच्या शेजारीं वसाहतींतील लोकांच्या राज्याचे जे प्रदेश होते ते बळकावण्याचा प्रारंभ केला व इंदियन लोकांनीं लुटालूट करण्याचें आरंभलें. त्या लोकांपासून आपलें संरक्षण करावें ह्मणून इंग्रज लोक फ्रेंच लोकांशीं लवकरच लढाई करतील असा समय दिसत होता. तेव्हां इंग्रज लोकांची कुमक करावी ह्मणून वसाहतींतील लोकांनीं सैन्य जमा करून निरनिराळ्या परगण्यांतील सैन्यावर एक एक अधिकारी नेमण्याचा उद्योग आरंभिला. त्या वेळेस वाशिंग्तनही एका सैन्याचा अधिकारी नेमला गेला. त्यास काम देण्याविषयीं त्याचे मित्र फेअर फाक्स यांनीं भीड खरचली. त्या वेळेस वाशिंग्तनाचें वय वीस वर्षांचें होतें. त्या कामांत त्यास वर्षास दीडशें पौंद ह्मणजे १,५०० रु० मिळकत होती. या गोष्टीपासून त्यास पलटणीकडील कामाची माहिती झाली. तें काम तो मोठ्या तत्परतेनें करीत असे. ज्या गोष्टी त्यास कळत नसत त्या त्या कामांत जे निपुण होते त्यांस तो विचारीत असे व संग्रामकौशल्याविषयीं मोठालीं पुस्तकें जवळ बाळगीत असे.

वाशिंग्तनास चाकरी मिळाल्यानंतर लवकरच त्याचा भाऊ लारेन्स हा फार अशक्त झाला. त्यास

नास वर्जिनिया येथें जावयास सांगितलें. लॉरेन्स याच्या मनांत बरमुदा येथें गेल्यावर तेथें आपली बायको न्यावयाची होती; परंतु ती गोष्ट घडून आली नाहीं. बरमुदा येथें गेला तरी त्यास चैन पडेना व प्रकृति पहिल्यापेक्षां जास्त बिघडली, ह्मणून तो पुनः वर्जिनिया येथें गेला. आणि तारीख २६ माहे जुलई सन १७५२ रोजीं मौंत वर्त्तन येथें मरण पावला. त्यास एक मुलगी मात्र होती. त्यानें आपल्या जिनगीचें वारसपत्र मुलीच्या नांवें करून दिलें आणि तिच्या मार्गे तिला मूल नसलें तर ती जिनगी वाशिंग्टनास मिळावी असें लिहून ठेविलें.

बरबेदोस येथून परत आल्यावर वाशिंग्टन पुनः लवकरच आपल्या लष्करी कामावर गेला. मि. दिनविदी यांस वर्जिनिया येथें लेफ. गवर्नराची जागा मिळाल्यानंतर त्यानें वसाहतींतील सर्व सैन्याचे चार विभाग केले. त्यांतून उत्तरेकडील सैन्य वाशिंग्टनाच्या तैनातीस दिलें. त्याचें काम निरनिराळ्या परगण्यांत जाऊन सैन्यावरील नाइकांस हुकूम द्यावे, सैन्याकडून कवाइती करवाव्या व त्यांनीं हत्यारें चांगलीं ठेविलीं आहेत किंवा नाहीं हें पाहावें एवढें होतें.









## फ्रेंच लोकांशीं लढाई.

आलेगानी पर्वतापलीकडे जे इंग्रज लोकांचे प्रांत होते त्यांवर फ्रेंच लोक हल्ले करीत होते, त्यांविषयीं दररोज कांहीं तरी नवें वर्त्तमान कानीं पडत असे, तें वर्त्तमान इंग्लंदांत देखील जाऊन पोंचलें. तेव्हां तेथील कामदारांनीं गवर्नर दिनविदी यास हुकूम पाठविला कीं, ओहिओ नदीवर दोन किल्ले बांधावे. जे लोक हल्ला करतील त्यांस बेलाशक तेथून हांकून द्यावें व इंग्रज सरकारचा हक्क तेथें चालू करावा, तेव्हां गवर्नरानें प्रथम राजाच्या नांवें तिकडे एक कामदार पाठवावा असा निश्चय केला. त्या कामदारानें जाऊन फ्रेंच लोकांचा जो सेनापति त्याशीं भाषण करावें व त्यास इंग्रज लोकांच्या प्रांतांवर हल्ले करण्याचें कारण विचारावें आणि फ्रेंच लोकांचें सैन्य किती आहे याची कच्ची बातमी काढावी; ते कोर्टपर्यंत हल्ला करीत येणार आहेत व त्यांस इंदियन लोकांचें साह्य किती आहे याचीही चौकशी करावी; अशीं कामें त्यास ठरविलीं. त्या कामांवर वाशिंग्तन यास वार्जिनिया प्रांताच्या अद्‌जुतंत जनरलची जागा व मेजर ही पदवी देऊन नेमिलें. त्या वेळेस त्याचें वय २२ बेवीस वर्षांचें होतें. त्याजबरोबर एकंदर सात असामी होते, त्यांत दोन दुभाषी होते. एक फ्रेंचांशीं बोलण्याकरितां व दुसरा इंदियनांशीं बोलण्याकरितां. त्यानें भर हिंवाळ्यांत रानटी लोकांच्या जंगलांतून, पांचशें साठ मैलपर्यंत प्रवास केला आणि

ज्या कामास त्याला पाठविलें होतें, तें काम बजावून तो तीन महिन्यानंतर वर्जिनिया प्रांतांतील मुख्य सरकारची जागा विल्यम्सबर्ग येथें परत आला. गवर्नर दिनविदी याचे मुख्य तीन उद्देश होते. ते हे कीं, इंग्रज लोकांस किल्ला बांधण्याकरितां सोईवार जागा कोठें आहे याचा शोध करावा, इंदियन लोकांशीं स्नेह करून फ्रेंच लोकांस त्यांस साह्य न करूं द्यावें व फ्रेंच लोकांच्या किल्ल्यांत जाऊन यावें. हीं तिन्ही कामें वाशिंग्तनानें केलीं. तो फ्रेंचांच्या किल्ल्यांत जाऊन सेनापति यास भेटला; परंतु त्या भेटीनें मनांत होतें तें काम झालें नाहीं, ह्मणून तेथील हवी तेवढी बातमी घेऊनच तो परतला. वाशिंग्तन हा विल्यम्सबर्ग येथें परत आल्यानंतर त्याची ह्या प्रवासांतील दिनचर्या वसाहतींतील व इंग्लंदांतील वर्त्तमानपत्रांत छापून प्रसिद्ध केली. ती लोकांस फार उपयुक्त वाटली. कां कीं, तिजवरून फ्रेंच लोक व इंग्लिश लोक त्या वेळेस परस्परांशीं कोणत्या रीतीनें वागत असत हें कळून येत असे.

त्यानंतर मि. दिनविदी गवर्नर यानें मोठ्या उत्साहानें युद्धाची तयारी चालविली. कायदे करणाऱ्या मंडळीस संकटकाळीं जे उपाय करणें बरोबर वाटतील ते सर्व उपाय त्यांनीं करावे ह्मणून त्यानें त्यांची लवकरच सभा भरविली. इतक्यानें त्याचें समाधान न होऊन त्यानें इतर प्रांतांतील गवर्नरांसही लिहिलें कीं, त्या त्या प्रांतांतल्या लोकांच्या मनांत या गोष्टीबद्दल काळजी उत्पन्न करावी. परंतु वसा-

हृतवाल्या लोकांस त्या गवर्नराची ही फारच त्वरा पाहून चांगलेंसें वाटलें नाहीं. ते ह्मणूं लागले कीं, "ज्या लढाईंत आमचा संबंध नाहीं तींत अशी घाई करून आह्मीं काय ह्मणून विनाकारण शिरावें ! फ्रेंच लोक आपली हद्द सोडून ओहिओ नदीवर आले, त्यांविषयीं विचार करण्याची वर्जिनियाच्या गवर्नरास काय गरज आहे. ते आमच्या राज्याच्या हद्दींत येत आहेत, हें तरी खचित आहे काय ! ह्या जमिनीवर ग्रेत ब्रितनाच्या राजाचा काय हक्क आहे बरें ! जर त्याचा आहे तर फ्रान्सांतील राजाचा तरी काय कमी आहे ! जर ग्रेत ब्रितनाच्या राजाचा हक्क आहेच, तर त्यानें आपले शिपाई फ्रेंचांस हटवण्याकरितां येथें पाठवावे कीं नाहीं ? वसाहत केलेले लोक लढाई करितील ह्मणून त्यानें काय ह्मणून स्वस्थ बसावें ? फ्रेंच लोक असले किंवा इंग्लंदचे लोक असले तरी आह्मांस सारखेंच. आह्मांस कोणीही दूध देत नाहींत." ते लोक जेव्हां अशा प्रकारच्या कुरकुरी करूं लागले तेव्हां त्या गवर्नरास फारच त्रास आला. पुष्कळच वादविवाद झाल्यावर देशसंरक्षणाकरितां वर्जिनियाप्रांतांतील कायदे करणाऱ्या लोकांनीं सरकारास दहा हजार पौंद, ह्मणजे एक लाख रुपये वर्गणीनें जमा करून दिले; परंतु वर्गणीच्या रीतीचा त्या गवर्नरास फारच राग आला. त्यानें होल्दर्नेस येथील स्वामिभक्त अरल यास असें लिहिलें कीं, "हे वसाहत करणारे लोक स्वतंत्र लोकांप्रमाणें वागतात;" तथापि त्यानें शिबंदी फौज जमा

गव्हर्नर आणि कर्नल फ्राय साहेब हे जे लोक चाकरीस राहतील त्यांस जमीन देतों असें सांगून लोकांस चाकरीस ठेवीत होते. ह्या कामांत ते गुंतले असतां वाशिंग्टनास, जेथें फ्रेंच लोक येऊन पोहोंचणार त्या ठिकाणीं सरहद्दीवर एक ठाणें होतें तेथें शिपायांच्या तीन टोळ्या देऊन पाठविलें; त्यावरून लढाईचा नेम झाला ह्मणजे प्रथम अर्थात आह्मांसच तोंड दिलें पाहिजे हें खचित आहे असें वाशिंग्टन समजला. ओहिओ येथें ब्रिटिशांचा किल्ला होता, तो फ्रेंचांनीं घेतला व त्यांची एक टोळी आपल्या ठाण्यावर आली, असें ऐकून त्यानें बेत केला कीं, आपण आतां अरण्यांत शिरावें. तसें केल्यानंतर १७५४ त मे महिन्याच्या २७ व्या तारखेस फ्रेंच लोकांचा सरदार जुमन्विल साहेब होता तो पन्नास शिपायांच्या टोळीनिशीं भेटला, त्यावेळेस गोळी वाजली त्या लढाईंत तो सरदार व त्याचे दहा लोक इतके पडले व वीसजण बंदिवान केले. वाशिंग्टनाचा सारा एकच शिपाई पडला व दोघां तिघांस जखमा मात्र झाल्या. लढाई चालू करण्याचा नेम रीतीप्रमाणें ठरला नव्हता, ह्मणून ही लढाईची बातमी ग्रेत ब्रितन व फ्रान्स ह्या दोहों देशांत कळतांच तेथें मोठी हाकाहाक झाली आणि लोकांनीं वाशिंग्टनास दोष लावला. फ्रान्सदेशांत जुमन्विल ह्याला क्रूरपणानें मारला, असें लोक समजूं लागले. तेथील शाहिरांनीं ह्या

लढाईवर कविताही केल्या, त्यांत वाशिंग्टनाचें चांगलें वर्णन केलें असें दिसत नाहीं. इंग्लंदांतील लोकांसही हें कृत्य चांगलें वाटलें नाहीं, असें पुढील ग्रंथाधारावरून दिसतें. हा ग्रंथ ही गोष्ट झाल्यावर लवकरच हारेस् वाल्पोल ह्यानें केला. या ग्रंथाचें नांव "दुसऱ्या जार्ज राजाचें चरित्र" असें आहे. वाल्पोल ह्मणतो, "मागल्या लढाईंत जो जय झाला त्या-विषयीं मेजर वाशिंग्टन साहेबानें इंग्लंदच्या राजास पत्र पाठविलें त्यांत त्यानें शेवटीं असें लिहिलें आहे कीं, 'बंदु-कीच्या गोळीचा आवाज ऐकून मला आनंद होतो.' नंतर राजानें समयोचित उत्तर असें केलें कीं, जर तो पुष्कळ गोळ्यांचे आवाज ऐकता तर तो असें न लिहिता." वाल्पोल यानें असें लिहिलें आहे कीं, वाशिंग्टन हा डौली असे. वाशिंग्टनास जेव्हां एका गृहस्थानें विचारलें कीं, वाल्पोल यानें लिहिलें आहे असें तूं कधीं ह्मणाला होतास काय? त्यावर त्यानें उत्तर दिलें कीं, मी ह्मणा-लों असलों तर कदाचित् लहानपणीं ह्मणालों असेन.

कर्नेल, फ्राय साहेब सेनेकडे जात असतां वाटेनें मर-ण पावला, तेव्हां अर्थात् वाशिंग्टन हाच मुख्य अधिकारी झाला. कां कीं, जरी कर्नेल इन्स हा त्या जाग्यावर नेमला होता तरी तो कामावर कधीं हजर झाला नाहीं. सेनेंतील सरदारांचे व शिपायांचे पगार कमी केले, त्या वेळेस त्या लोकांस राग आला आणि वाशिंग्टनास फारच संकट पडलें; तथापि ह्याच्या सैन्यांत तीनशें लोकांवर शिबंदी लोक होते व दीडशें लोक इतर होते व त्यांवर कप्तान मकाई साहेब अधिकारी होता.

